सन २०१४-१५ या वर्षातील अल्प मुदत कर्जाचे मध्यम मुदत कर्जात रुपांतरण करण्यासाठी महाराष्ट्र राज्य सहकारी बँकेस मध्यम मुदत कर्ज आकस्मिक निधीमधून मंजूर करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,
शासन निर्णय क्रमांक -एससीआर -०४१५/प्र क्र-१५०/२-स
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय (विस्तार), मुंबई ४०० ०३२
दिनांक : ७ ऑगस्ट,२०१५.

वाचा :- १) शासन निर्णय क्र SCR ०४१५/प्रक्र १५०/ २ स दिनांक २४.६.२०१५
२) शासन निर्णय क्रमांक -एससीआर -०४१५/प्र क्र-१५०/२-स, दि. ७.७.२०१५

प्रस्तावना :

राज्यात टंचाई परिस्थिती जाहीर झालेल्या भागात शेतकऱ्यांना मदत करण्यासाठी अल्पमुदत पीक कर्जाचे रूपांतरण मध्यम मुदत कर्जात केले जाते. जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकांनी पीक कर्जाचे रुपांतरण केल्यानंतर अशा रुपांतरीत कर्जाच्या ६०% रक्कम नाबार्डमार्फत शासनाच्या हमीवर महाराष्ट्र राज्य सहकारी बँकेस फेरकर्ज म्हणून मंजूर करण्याचे धोरण आहे. याशिवाय रुपांतरीत कर्जाचा १५% हिस्सा राज्य शासनामार्फत व १०% हिस्सा महाराष्ट्र राज्य सहकारी बँकेमार्फत कर्ज स्वरुपात उपलब्ध करणे अपेक्षित आहे. उर्वरीत १५% रक्कम संबंधित जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकेने स्वभांडवलातून उपलब्ध करणे आवश्यक आहे.

सन २०१४-१५ यावर्षात ५० पैसेपेक्षा कमी पैसेवारी जाहीर केलेल्या जिल्हयापैकी अकोला, अमरावती, यवतमाळ, गडचिरोली, चंद्रपूर, भंडारा व नाशिक या ७ जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकांनी रुपये ७७९.३७ कोटी रकमेचे रुपांतरण केले असून या रकमेच्या १५% हिश्श्याची रक्कम रु. ११६.९० कोटी शासनामार्फत उपलब्ध करण्याचा प्रस्ताव सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचेमार्फत शासनास प्राप्त झाला आहे. तथापि, या ७ बँकांपैकी अकोला, यवतमाळ व चंद्रपूर या बँकांना रु. ३९३१.५५ लाख सन २०१५-१६ या वर्षात सदर योजनेअंतर्गत वितरीत करण्यात आली असल्यामुळे उर्वरित रक्कम रुपये ७७५९.०० लाख या ७ जि.म.स. बँकांना वितरीत करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. तथापि, त्यापैकी गडचिरोली व भंडारा या बँकांना राज्य शासनाच्या १५% हिश्श्याची रक्कम आवश्यक नसल्याबाबत सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी दि. ४.८.२०१५ रोजी शासनास कळविले आहे. त्यामुळे या दोन बँका वगळून अन्य पाच जि.म.स. बँकांना शासनाच्या हिश्श्याची रक्कम रु. ७६४५.४७ लाख मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय :

राज्यात टंचाई परिस्थिती जाहीर झालेल्या भागातील शेतकऱ्यांच्या अल्पमुदत कर्जाचे मध्यम मुदत कर्जात रुपांतरण करण्यासाठी नाबार्डच्या धोरणानुसार राज्य शासनाच्या १५% हिश्श्यापोटी रुपये ७६४५.४७ लाख (रुपये शहयात्तर कोटी पंचेचाळीस लाख सत्तेचाळीस हजार फक्त) आकस्मिकता अग्रीमातून उपलब्ध होणा-या निधीतून वितरीत करण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

सदर रक्कम रु ७६४५.४७ लाख महाराष्ट्र राज्य सहकारी बँकेस मध्यम मुदत कर्ज म्हणून खालील ५ जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकांना पूढे हस्तांतरीत करण्यासाठी मंजूर करण्यात येत आहे.

| अ.क्र. | जिल्हा मध्यवर्ती बँकेचे नाव | राज्य शासनाचा १५% हिस्सा रक्कम (रु. लाखात) |
|---|---|---|
| १ | अकोला जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँक लि. | ३८६०.३६ |
| २ | अमरावती जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँक लि. | १९८४.३७ |
| ३ | यवतमाळ जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँक लि. | १७.३८ |
| ४ | चंद्रपूर जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँक लि. | ७९१.०१ |
| ५ | नाशिक जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँक लि. | ९९२.३५ |
| | एकूण | ७६४५.४७ |

२. वरील कर्जासाठी अटी व शर्ती खालीलप्रमाणे राहतील :-

अ) कर्जाच्या परतफेडीचा कालावधी ५ वर्षाचा राहील.

आ) कर्ज परतफेड व्याजासह समान हप्त्याने करण्यात यावी.

इ) सदर कर्जाचा व्याजदर या योजनेसाठी नाबार्डकडून महाराष्ट्र राज्य सहकारी बँकेस देण्यात येणा-या फेरकर्जाच्या व्याजदराप्रमाणे राहील.

३. सदर आकस्मिकता निधी अग्रिम वित्त विभाग, शासन ज्ञापन क्रमांक आकनि २०१५ / प्र.क्र.१२/ अर्थसंकल्प १३, दिनांक ४ ऑगस्ट २०१५ अन्वये मंजूर करण्यात आले असून त्याचा संकगण संकेतांक क्रमांक ८००० ७१०८) असा आहे. या प्रित्यर्थचा खर्च संगणकीय अर्थसंकल्पिय निधी वितरण प्रणालीनुसार करण्यात यावा.

४. वरीलप्रमाणे मंजूर करण्यात आलेल्या रुपये ७६४५.४७ लाख रकमेचे वितरण करण्यासाठी लेखा अधिकारी, सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था कार्यालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच सहकार आयुक्त व निबंधक सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५. आहरण व संवितरण अधिकारी यांचे लक्ष महाराष्ट्र आकस्मिकता निधी नियम क्र ६,८ आणि १२ कडे वेधण्यात येत आहे. तसेच आहरण व संवितरण अधिकारी यांनी वित्त विभाग, शासन परिपत्रक, क्रमांक-: सीएनएफ १०८३/१४०/अर्थसंकल्प-३, दिनांक २६.४.१९८३ आणि वित्त विभाग,शासन परिपत्रक क्रमांक १०८६/१५३/अर्थसंकल्प-३, दिनांक २८.८.१९८६ च्या परिच्छेद २(१) मध्ये दर्शविलेल्या सूचनांच्या संदर्भत खालील बाबींचे अनुपालन करावे.

अ) आकस्मिकता निधी अग्रिमातून काढण्यात येणा-या प्रत्येक रकमेच्या देयकावर वरच्या कोप-यात आकस्मिकता निधी हा शब्द लिहावा. तसेच आकस्मिकता निधी मंजूर केलेल्या वित्त विभाग, शासन ज्ञापन क्रमांक : आकनि २०१४/५/अर्थसंकल्प -१३, दिनांक २० नोव्हेंबर, २०१४ अन्वये मंजूर असे प्रत्येक देयकावर **"लाल शाईने"** लिहावे.

ब) आकस्मिकता निधीतून मंजूर केलेल्या रु. ७६४५.४७ लाख इतका अग्रिम दिनांक ३१ ऑगस्ट २०१५ पर्यंत पूर्णत: खर्च होईल याची सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, पुणे यांनी दक्षता घ्यावी.

क) आकस्मिकता निधीतून मंजूर केलेल्या खर्चाचा हिशोब वेगळा ठेवून त्यासंबंधीचा मासिक खर्चाचा प्रगती अहवाल प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत शासनास (सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग आणि वित्त विभाग) तसेच महालेखापाल यांना सादर करावा.

ड) देयकासमवेत जोडण्यात येणा-या संगणक स्लिपमध्ये मुख्य लेखाशिर्ष /गौण शिर्ष / संकेतांक इत्यादि उल्लेख करावा.

६. वरीलप्रमाणे मंजूर करण्यात आलेली रक्कम रु ७७५९.०० लाख सहकार , पणन व वस्त्रोद्योग विभाग, , मागणी क्रमांक व्ही ५, ६४२५ सहकारासाठी कर्जे, (००)(१०७) सहकारी पतसंस्थांना कर्जे, (००) (०३) अल्पमुदतीच्या कर्जाचे मध्यम मुदतीच्या कर्जात रूपांतर करण्यासाठी सहकारी पतसंस्थांना कर्जे (६४२५ ००३७) या लेखाशिर्षाखाली खर्च करण्यात यावी.

७. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौचारीक संदर्भ क्र ३३७/१५/व्यय २ दि. १/८/२०१५ नुसार मिळालेल्या मान्यतेन व वित्त विभाग, ज्ञापन क्रमांक : आकनि २०१५ / प्र.क्र.१२/अर्थसंकल्प १३, दिनांक ४ ऑगस्ट २०१५- अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या सकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०१५०८०७१०२७५५८३०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने

Santosh Arun Patil

Digitally signed by Santosh Arun Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Officer On Special Duty, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=e52439642ab57c332b2a3e3e46f0d907ba6167409ef6d52c943bf775ecf042fd, cn=Santosh Arun Patil
Date: 2015.08.07 10:55:47 +05'30'

**(संतोष पाटील)**
**विशेष कार्य अधिकारी**

**प्रति,**

१. सहकार आयुक्त व निबंधक सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२. प्रधान सचिव (मतदकार्य व पूनर्वसन), महसूल व वन विभाग, मंत्रालय.
३. महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता) (लेखापरीक्षण) महाराष्ट्र राज्य, मुंबई (३ प्रती)
४. महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता) (लेखापरीक्षण) महाराष्ट्र राज्य- नागपूर (३ प्रती)
५. महाव्यवस्थापक, NABARD, प्लॉट नं. सी-२४/जी, बांद्रा-कुर्ला संकुल, पोस्ट बँग नं. ८१२१, बांद्रा पूर्व, मुंबई ४०००५१
६. कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी बॅक मर्या, मुंबई.
७. कार्यकारी संचालक, जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँक - (अकोला अमरावती, यवतमाळ, गडचिरोली, चंद्रपूर, भंडारा व नाशिक)
८. सहसंचालक , लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन ५ वा मजला, मंत्रालया समोर
९. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई /पुणे (३ प्रती)
१०. निवासी लेखापरिक्षाधिकारी, मुंबई. / पुणे
११. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे. (३ प्रती)
१२. नियोजन विभाग (१४३१) मंत्रालय, मुंबई
१३. वित्त विभाग (व्यय-२, व्यय-१४, अर्थ-१३), मंत्रालय, मुंबई
१४. कक्ष अधिकारी (१६-स, व १७-स), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय मुंबई-३२
१५. निवड नस्ती (२-स)